**सफाई कर्मचा-यांच्या वारसा हक्कांबाबत नगरपरिषद प्रशासन संचालनालयाने निर्गमित केलेली परिपत्रके/ स्थायी आदेश महानगरपालिकांमधील सफाई कर्मचा-यांच्या वारसा हक्क प्रकरणांमध्ये लागू करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक : लापास-२०१९/प्र.क्र.६३/नवि-६**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

दिनांक : १० फेब्रुवारी, २०२०.

**प्रस्तावना :**

सफाई कर्मचा-यांना वारसा हक्काने नियुक्ती देण्याबाबत सामाजिक न्याय विभागाकडून दिनांक २१/१०/२०११ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये धोरण निश्चित करण्यात आले असून, त्यात त्याच विभागाकडून वेळोवेळी बदल केले जातात. त्या विभागाच्या दिनांक २१/१०/२०११ च्या शासन परिपत्रकापूर्वी, या अनुषंगाने नगर विकास विभागामार्फत व नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांचेकडून वेळोवेळी शासन निर्णय/परिपत्रक/स्थायी आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. त्यातील नगरपरिषद प्रशासन संचालनालयाने निर्गमित केलेली परिपत्रके/स्थायी आदेश केवळ राज्यातील नगरपरिषदां/नगरपंचायती यांना लागू आहेत. सामाजिक न्याय विभागाने वरील दिनांक २१/१०/२०११ रोजीचे परिपत्रक निर्गमित करताना नगर विकास विभागाने/ संचालनालयाने निर्गमित केलेल्या आधीच्या परिपत्रकातील तरतूदी बाधीत केलेल्या नाहीत. सदरची परिपत्रके/स्थायी आदेश महानगरपालिकांना लागू राहतील किंवा कसे याबाबत शासनाकडे विचारणा होत आहे.

राज्यातील सफाई कर्मचाऱ्यांच्या वारसा हक्कांबाबत राज्यातील सर्व विभागाच्या अधिपत्याखालील सफाई कर्मचाऱ्यांबाबत नियम व धोरणे सारखीच आहेत व एकवाक्यतेच्या दृष्टीने तशी असणे आवश्यकही आहे. सबब, नगरपरिषदा/नगरपंचायतीमधील सफाई कर्मचा-यांचे व महानगरपालिकेमधील सफाई कर्मचा-यांचे वारसा हक्क नियुक्ती प्रकरणात एकवाक्यता राहण्याच्या दृष्टीने खालीलप्रमाणे निदेश देण्यात येत आहेत:-

**शासन परिपत्रक :**

राज्यातील महानगरपालिकांमधील सफाई कर्मचा-यांच्या वारसा हक्क नियुक्ती प्रकरणांमध्ये नगरपरिषद प्रशासन संचालनालयाने निर्गमित केलेल्या दिनांक २३/०३/२००६ रोजीच्या परिपत्रकासह आतापर्यंत वेळोवेळी निर्गमित केलेली परिपत्रके/स्थायी आदेश हे महानगरपालिकांमधील वारसा हक्क नियुक्ती प्रकरणात देखील लागू राहतील.

०२. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२००२११११२७२०२२२५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

SATISH J MOGHE

Digitally signed by SATISH J MOGHE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=c065ad8ea11d83b12ceafb3840d637aa784932b1cae9568b618c844e3cf5aed6, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=e7fde1eb36d7f614ec7f3b9970fa793e6b745bca70b672c62d914f3466a11b44, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SATISH J MOGHE
Date: 2020.02.11 11:29:27 +05'30'

**( सतीश मोघे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

(१) सर्व महानगरपालिका आयुक्त.
(२) नगर विकास विभागातील सर्व अवर सचिव / कार्यासन अधिकारी
(३) निवडनस्ती (नवि-६) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.